**विधानमंडळ सदस्यांना मोहर (रबरी शिक्के) पुरविणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन,**
**शासन परिपत्रक, क्रमांक :संलेसा-२०१४/प्र.क्र.७२/तीन,**
**संसदीय कार्य विभाग,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :-३ नोव्हेंबर, २०१५.**

**वाचा:-** १) शासन परिपत्रक, विधान कार्य विभाग क्र.संकीर्ण-१०८५/प्र.क्र.७/दोन, दि.२२ फेब्रु., १९८५.
२) शासन परिपत्रक, विधान कार्य विभाग, क्र.संकीर्ण-१०८५/प्र.क्र.७/दोन, दि.१३ जून, १९८६.
३) शासन परिपत्रक, विधान कार्य विभाग, क्र.संकीर्ण-१०८५/प्र.क्र.७/दोन, दि.८ मार्च, १९९०.
४) शासन पत्र, संसदीय कार्य विभाग, क्र.संकीर्ण-१०८५/प्र.क्र.७/दोन, दि.११ जानेवारी, २०१०.
५)अर्धशासकीय पत्र,संसदीय कार्य विभाग क्र.संलेसा-२०१४/प्र.क्र.७२/तीन, दि.२४ जुलै, २०१४.
६)अर्धशासकीय पत्र, सं. कार्य विभाग क्र.संलेसा-२०१४/प्र.क्र.७२/तीन, दि.१३ ऑक्टो., २०१४.
७) शासन पत्र, संसदीय कार्य विभाग, क्र.संलेसा-२०१४/प्र.क्र.७२/तीन, दि.१५ नोव्हेंबर, २०१४.
८) शासन पत्र, संसदीय कार्य विभाग, क्र.संलेसा-२०१४/प्र.क्र.७२/तीन, दि.२४ नोव्हेंबर, २०१४.
९) शासन पत्र, संसदीय कार्य विभाग, क्र.संलेसा-२०१४/प्र.क्र.७२/तीन, दि.२३ जानेवारी, २०१४.

**प्रस्तावना :-**

मुंबई सार्वजनिक प्राधिकारी शिक्के (सुधारणा) अधिनियम, १९८१ हा दिनांक १५ जुलै, १९८१ पासून लागू करण्यात आला असून, त्यामधील तरतुदींनुसार महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन्माननीय सदस्यांना मराठी व इंग्रजी वर्तुळाकृती मोहर (रबरी शिक्के) पुरविण्याबाबत वरील संदर्भाधीन शासन परिपत्रके व पत्रांन्वये वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. तथापि, सन्माननीय सदस्यांना सदर शिक्के पुरविण्यामध्ये कालापव्यय होऊ नये व कार्यपद्धतीमध्ये सुसूत्रता रहावी, यासाठी यासंदर्भातील यापूर्वीच्या सर्व आदेशांचे एकत्रिकरण करून सर्वसमावेशक आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार, शासनाने पुढीलप्रमाणे सूचना देण्याचा निर्णय घेतला आहे :-

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन्माननीय सदस्यांना मराठी व इंग्रजी वर्तुळाकृती शिक्के पुरविण्यासंदर्भातील उपरोक्त संदर्भात नमूद केलेले यापूर्वीचे सर्व आदेश अधिक्रमित करण्यात येत असून सन्माननीय सदस्यांना मोहर (रबरी शिक्के) पुरविण्याबाबत पुढीलप्रमाणे कार्यपद्धती अनुसरण्यात यावी :-

**अ)** सन्माननीय विधानमंडळ सदस्यांना ३.८१ सें.मी.आकाराचे (दीड इंच व्यासाचे) नवीन विधानभवनाचे चित्र असलेले, खालील नमुन्यात दर्शविल्यानुसार, मराठी व इंग्रजी वर्तुळाकृती मोहर (रबरी शिक्के) पुरविण्यात यावेत.

**विहीत नमुना**

**मराठी**




**इंग्रजी**




**ब)** उक्त मोहर (रबरी शिक्के) हे नवनिर्वाचित सदस्य, पोटनिवडणुकीत निवडून आलेले सदस्य व नामनिर्देशित सदस्य असे सर्व सन्माननीय सदस्य यांना जिल्हाधिकारी यांचेमार्फत पुरविण्यात यावेत.

**क)** विधानमंडळाचे सदस्यत्व संपुष्टात आलेल्या, निवडणुकीस उभे न राहिलेल्या अथवा निवडून न आलेल्या किंवा अन्य कोणत्याही कारणांमुळे ज्यांचे सदस्यत्व संपुष्टात आलेले आहे अशा मा.सदस्यांकडून त्यांना यापूर्वी पुरविण्यात आलेले मोहर (रबरी शिक्के) जिल्हाधिकारी यांनी परत घ्यावे.

**ड)** परत घेतलेल्या मोहर (रबरी शिक्के) यांपैकी सुस्थितीतील शिक्के पुन्हा मा.विद्यमान सदस्यांना वितरीत करण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी उपयोगात आणावे.

**आ)** जिल्हाधिकारी यांच्याकडे उपलब्ध असलेल्या मोहर (रबरी शिक्के) व्यतिरिक्त अधिक शिक्क्यांची आवश्यकता भासल्यास, जिल्हाधिकारी यांनी व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व लेखन सामुग्री, चर्नीरोड, मुंबई-४०० ००४ यांच्याकडे मागणी करावी व तशी मागणी केल्याचे या विभागास कळवावे. कोणत्याही परिस्थितीत, खाजगी यंत्रणेकडून मोहर (रबरी शिक्के) खरेदी करण्यात येऊ नयेत.

**इ)** जिल्हाधिकारी यांना त्यांच्या मागणीनुसार मोहर (रबरी शिक्के) पुरविण्याबाबत व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व लेखन सामुग्री यांना शासनाकडून स्वतंत्रपणे सूचना देण्यात आल्या आहेत.

**ई)** जिल्हाधिकारी यांनी मा.विधानमंडळ सदस्यांकडून परत घेण्यात आलेल्या तसेच, शासकीय मुद्रणालयाकडून उपलब्ध करून घेतलेल्या व मा.सदस्यांना पुरविलेल्या तसेच, त्यांच्याकडे शिल्लक असलेल्या मोहर (रबरी शिक्के) (सदस्यांचे नांव, मतदार संघ या तपशिलासह) याबाबतचा अहवाल या परिपत्रकासोबतच्या **'विवरणपत्र-अ'** मध्ये, दरवर्षी जून व डिसेंबर अखेर असा वर्षातून दोन वेळा, शासनाला देणे बंधनकारक राहील.

२. सर्व जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील मा.विधानमंडळ सदस्यांना मराठी व इंग्रजी शिक्के पुरविण्यासंदर्भात, वरील सर्व सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक **२०१५११०३१६५३२४६६१५** असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

सु. अ. देशपांडे

**( सु. अ. देशपांडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव. विधानभवन, मुंबई-४०० ०३२
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
५. मा. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
८. मा. सर्व विधानपरिषद सदस्य, ( संबधित जिल्हाधिकारी यांचे मार्फत)
९. मा. सर्व विधानसभा सदस्य, ( संबधित जिल्हाधिकारी यांचे मार्फत)
१०. सर्व विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर विभाग.
११. सर्व जिल्हाधिकारी. जिल्हाधिकारी कार्यालय (१० जादा प्रतीसह)
त्यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील सन्माननीय विधानमंडळ सदस्यांना प्रस्तुत परिपत्रक कृपया पाठविण्याची व्यवस्था करावी.
१२. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई- ४०० ०३२.
१३. व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व लेखन सामुग्री, चर्नीरोड, मुंबई-४०० ००४.
१४. कार्यासन अधिकारी, कार्या.क्र.दोन/तीन/चार/पाच/सहा, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती.

# विवरणपत्र 'अ'

मुंबई सार्वजनिक प्राधिकारी शिक्के (सुधारणा) अधिनियम, १९८१ मधील कलम ५(१),(२) व (३)अनुसार विधानमंडळ सदस्यांना पुरविण्यात आलेले, परत घेतलेले मोहर (रबरी शिक्के) याचा तपशील.

(माहे जून, ......../ माहे डिसेंबर,......अखेर)

| अनु. क्र. | दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१५ रोजी जिल्हाधिकारी कार्यालयाकडे उपलब्ध असलेले एकुण मोहर (रबरी शिक्के) | | शासकीय मुद्रणालयाकडून उपलब्ध करून घेतलेले एकुण मोहर (रबरी शिक्के) | | मोहर (रबरी शिक्के) पुरविलेल्या मा. विधानमंडळ सदस्यांचे नाव व पत्ता. | मतदार संघ. | मा. विधानमंडळ सदस्यांकडून प्राप्त झालेल्या मोहर (रबरी शिक्के) | | मराठी व इंग्रजी दोन्ही मोहर (रबरी शिक्के) परत केले का? नसल्यास, त्यापैकी कोणता शिक्का परत केला नाही? | | मोहर (रबरी शिक्के) परत न करण्याची कारणे. | जिल्हाधिकारी कार्यालयाकडे शिल्लक असलेल्या मोहर (रबरी शिक्के) यांची संख्या. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | | ३ | | ४ | ५ | ६ | | ७ | | ८ | ९ | |
| | मराठी | इंग्रजी | मराठी | इंग्रजी | | | मराठी | इंग्रजी | मराठी | इंग्रजी | | मराठी | इंग्रजी |
| | | | | | | | | | | | | | |

(नाव- )

जिल्हाधिकारी,

जिल्हा:-